**श्रीमती आश्विनी अं. नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या कायमस्वरुपी बदलीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग, मंत्रालय,**
**कार्यालयीन आदेश क्रमांक इएसटी २०१६/प्र.क्र.१३०/का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११ जून, २०१८

**संदर्भ** :- १) विधि व न्याय विभाग आदेश क्रमांक ईएसटी-२०१३/प्र.क्र. २५१/२ दिनांक ०६ डिसेंबर, २०१३
२) श्रीमती अ.अं. नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांचा दिनांक २१.०८.२०१७ व ०१.०३.२०१८ रोजीचे अर्ज
३) मृद व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र. आस्थाप-२०१८/प्र.क्र. ३७/ जल-२, दिनांक ०६.०६.२०१८

## कार्यालयीन आदेश

विभागातील श्रीमती अ.अं. नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांनी संवर्गबाहय बदली मिळण्याकरिता संदर्भ क्रमांक २ येथील अर्जान्वये केलेली विनंती मान्य करुन त्यांची मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या क्षेत्रीय आस्थापनेवरील जिल्हा जलसंधारण अधिकारी , कोल्हापूर या कार्यालयातील कार्यालयीन अधीक्षक (वे.श्रे. ९३००-३४८००+ग्रे.वे. ४२००) या निम्नश्रेणी पदावर खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून बदली करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. श्रीमती अ.अं. नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी (वे.श्रे.९३००-३४८००+ग्रे.वे.४३००) यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून ०८.३.२०१० (म.पू.) पासून विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई येथे सहायक कक्ष अधिकारी या पदावर ,खुल्या प्रवर्गातून नियुक्ती करण्यात आलेली होती. त्यांनी ३ वर्षाचा सेवा कालावधी पूर्ण केल्यानंतर (संदर्भ क्र. १ येथील) दिनांक ०६.१२.२०१३ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये श्रीमती नानिवडेकर यांना शासकीय सेवेतील स्थायित्व प्रमाणपत्र देण्यात आलेले आहे.

३. सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. एसआरव्ही २०११/प्र.क्र.२१०/१०/१२, दि.०३.०६.२०११ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील अ.क्र.३ येथील अटीनुसार श्रीमती नानिवडेकर यांनी शासन सेवेची ५ वर्षे पूर्ण केली आहेत.

४. श्रीमती नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांनी ज्या कार्यालयात बदलीबाबत विनंती केली आहे, त्या मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी त्यांच्या क्षेत्रीय आस्थापनेवरील जिल्हा जलसंधारण अधिकारी , कोल्हापूर या कार्यालयात कार्यालयीन अधीक्षक या रिक्त पदावर संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये कायमस्वरुपी बदलीने नियुक्ती केली आहे.

५. या बदलीच्या अनुषंगाने श्रीमती नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांना पदग्रहण अवधी, बदली अनुदान, प्रवास भत्ता वा तद्नुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

६. ज्या पदावर बदलीबाबत विनंती केली आहे त्या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदी, तसेच, त्या पदास विहित केलेल्या परिक्षा व अन्य बाबींची पूर्तता करणे श्रीमती नानिवडेकर यांना आवश्यक राहील.

७. श्रीमती नानिवडेकर यांच्या बदलीनंतर त्या पदावरील त्यांची ज्येष्ठता रूजू झालेल्या दिनांकास निश्चित होईल. तसेच, पूर्वीच्या सेवेचा लाभ, वेतननिश्चिती, रजा, निवृत्तीवेतन इ. करीता वित्त विभागाच्या संबंधित नियमातील तरतूदीनुसार अनुज्ञेय होईल.

८. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०३.०६.२०११ रोजीच्या शासन निर्णयात विहित केलेल्या सर्व अटी मान्य असल्याचे श्री. नानिवडेकर यांचेकडून लेखी स्वरूपात बंधपत्र घेण्यात आले आहे.

९. श्रीमती नानिवडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांना मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या क्षेत्रीय आस्थापनेवरील जलसंधारण यंत्रणेतील जिल्हा जलसंधारण अधिकारी, कोल्हापूर या कार्यालयातील रिक्त असलेल्या कार्यालयीन अधीक्षक या पदावर संवर्गबाहय बदलीने कायमस्वरुपी समावेशन करुन रुजू होण्याकरिता दि. ११.०६.२०१८ (म.नं.) पासून विभागाच्या आस्थापनेवरुन कार्यमुक्त करण्यात येत आहे.

१०. सदर आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. एसआरव्ही २०११/प्र.क्र.२१०/१०/१२, दि.०३.०६.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारांच्या अटी व शर्तींच्या अधिन राहून तसेच शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहेत.

सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२१२२८२९२२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Jyostna Sainath Borkar

Digitally signed by Jyostna Sainath Borkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f9a99ca6387db93fd460c58b6a74a5e3c650b410a7e397d26b14d297b7e7029e, cn=Jyostna Sainath Borkar
Date: 2018.06.12 12:28:09 +05'30'

(ज्यो.सा.बोरकर)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
४. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त, मृद व जलसंधारण आयुक्तालय, औरंगाबाद
७. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
९. जिल्हा जलसंधारण अधिकारी, कोल्हापूर
१०. अवर सचिव/का.१४ अ , सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन अधिकारी, कार्यासन २०, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. ( २प्रती) यांनी श्रीमती नानिवडेकर यांचे मूळ सेवापुस्तक व अंतीम वेतनप्रमाणपत्र संबंधित कार्यालयाकडे पाठविण्याची कार्यवाही करावी.
१२. कक्ष अधिकारी / का-२ अ, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. श्रीमती अ.अं. नानिवडेकर ,सहायक कक्ष अधिकारी ,विधि व न्याय, मंत्रालय, मुंबई
१४. हजेरी लिपिक /वैयक्तिक नस्ती / निवडनस्ती.